**सन २०१५-२०१६ या शैक्षणिक वर्षापासून +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय ( एच.एस.सी. व्होकेशनल ) अभ्यासक्रमाच्या नविन / अधिकच्या तुकडयांना कायम स्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः व्हीओसी-२०१५/प्र.क्र.१०५/१५/व्यशि-४,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ०७ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ** : १) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ४/व्हीओसी/२२०३/२०१५-१६/४३, दिनांक २५/५/२०१५.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या १९८६ च्या नविन शैक्षणिक धोरणानुसार + २ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रमाचे शिक्षण देऊन जास्तीत जास्त युवकांना रोजगार/स्वयंरोजगार करण्यास प्रोत्साहित करण्याच्या दृष्टीने राज्यात १९८८-८९ पासून ७०% व्यवसाय शिक्षण व ३०% सामान्य शिक्षण अंतर्भूत असलेले किमान कौशल्यावर आधारित व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात आले. हे अभ्यासक्रम प्रात्यक्षिकाभिमुख असल्याने विद्यार्थाना संबंधित व्यवसायाशी निगडीत किमान कौशल्य प्राप्त करुन स्वत:चा उद्योग सुरु करावा अथवा औद्योगिक आस्थापनामध्ये नोकरी करावी आणि उच्च शिक्षणाकडे जाणारा लोढां कमी व्हावा हा या योजनेचा उद्देश आहे. या अभ्यासक्रमाचे किमान कौशल्यावर आधारीत अभ्यासक्रम हे नाव संदर्भांकीत अनु क्र.१ च्या शासन निर्णयान्वये बदलण्यात आले असून ते उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम (H.S.C.Vocational) असे करण्यात आले आहे.

सदर व्यवसाय अभ्यासक्रमाची वाढती मागणी लक्षात घेऊन शैक्षणिक वर्ष २०१५-१६ मध्ये +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नविन /अधिकच्या तुकडया कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर सुरु करणेसाठी इच्छुक संस्थांकडून प्राप्त झालेल्या अर्ज/प्रस्तावांची संचालनालय स्तरावर छाननी करण्यात आली. त्यानुसार संचालनालयाने शासनास शिफारस केलेल्या प्रस्तावातील विहित निकष/मानकांची पूर्तता करणाऱ्या ६ अशासकीय संस्थांमध्ये +२ स्तरावरील उच्च माध्यमिक (H.S.C.Vocational) व्यवसाय अभ्यासक्रमाच्या १७ नविन/अधिकच्या तुकडयांना कायम विनाअनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

+२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या ६ अशासकीय संस्थांमधील १७ नविन/अधिकच्या तुकडया (खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे) कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०१५-२०१६ पासून सुरू करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे याचा लाभ राज्यातील ३४० विद्यार्थांना होणार आहे.

| विभाग | अ. क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | अभ्यासक्रमाचे नाव मंजूर तुकडयांची संख्या | मंजूर तुकडयांची संख्या (प्रवेश क्षमता २० विद्यार्थी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **पुणे** | १ | एम.सी.ई.संचलित ॲग्लो उर्दु गर्ल्स हायस्कूलचे अबेदा इनामदार ज्यु.कॉलेज फ़ॉर गर्ल्स, पुणे १ (जुनी संस्था) | फ़ुड प्रॉडक्शन | १ तुकडी |
| | | | टुरिझम ॲन्ड हॉस्पीटॅलिटी मॅनेजमेट | १ तुकडी |
| | | | कॉम्प्युटर टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | २ | सुर्यदत्त एज्यु. फ़ाउंडेशनचे सुर्यदत्त ज्युनिअर कॉलेज ऑफ़ आर्ट्स,कॉमर्स ॲन्ड सायन्स बावधन पुणे. (नवीन संस्था) | अकाऊटिंग फ़ायनाशियल ऑफ़ीस मॅनेजमेंट | १ तुकडी |
| | | | फ़ुड प्रॉडक्शन | १ तुकडी |
| | | | टुरिझम ॲन्ड हॉस्पीटॅलिटी मॅनेजमेट | १ तुकडी |
| | ३ | ससाणे एज्यु.सोसायटीचे न्यु इंग्लिश स्कूल आर्ट्स,कॉमर्स ॲन्ड सायन्स ज्युनिअर कॉलेज, ससाणे नगर न्यु बायपासरोड हडपसर, पुणे .(नवीन संस्था) | कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | | | कॉम्प्युटर टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| **औरंगाबाद** | ४ | जीवनरेखा प्रतिष्ठान लातूर द्वारा संचलित जीवनरेखा कनिष्ठ महाविद्यालय लातूर | मेडीकल लॅबोरेटरी टेक्निशियन | १ तुकडी |
| | | | अकाऊटिंग फायनन्शियल ऑफ़ीस मॅनेजमेंट | १ तुकडी |
| | | | कॉम्प्युटर टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | ५ | स्वामी विवेकानद चॅरिटेबल ट्रस्ट संचलित गणेशराव देशमुख इन्स्टिट्युट ऑफ़ टेक्नॉलॉजी नारायणनगर बाभळगाव ता.जि. लातूर | इलेक्ट्रिकल टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | | | मेकॅनिकल टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | | | कॉम्प्युटर टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | | | मेडीकल लॅबोरेटरी टेक्निशियन | १ तुकडी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **नागपूर** | ६ | स्वर्गीय मधुकरराव देशमुख शिक्षण संस्था नागपूर संचलित अवधूत एमसीव्हीसी महाविद्यालय कुही, जि. नागपूर | इलेक्ट्रिकल टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | | | कॉम्प्युटर टेक्नॉलॉजी | १ तुकडी |
| | **एकूण संस्था-६** | | **एकूण तुकड्या-१७** | |

## अटी व शर्ती

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहितेमध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यास कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यात येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्याकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.

५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले +२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम "** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता यांचा उल्लेख करण्यात यावा.

६. संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन तात्काळ अभ्यासक्रम सुरु करावेत.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा/वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सामाजिक/ समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यात यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या नविन/अधिकच्या तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी २० असून शैक्षणिक वर्ष २०१५-२०१६ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तींमध्ये बदल करण्याचे किंवा नविन अटी व शर्ती अंतर्भूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

१४.+२ स्तरावरील उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या वरीलप्रमाणे मान्यता दिलेल्या तुकडयांमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यापूर्वी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांचेकडून स्थानिक स्तरावर समिती नेमून समितीच्या निरीक्षणानुसार संचालनालयाच्या परवानगीने प्रवेश देण्यात यावेत.

१५.व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत मंजूर व्यवसाय अभ्यासक्रमाच्या मंजूर तुकडीनुसार प्रवेश क्षमतेपेक्षा अतिरिक्त अनधिकृत प्रवेश केल्यास शासनाने सन २०१३ या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २० राजपत्र दि. २१/८/२०१३ अन्वये प्रसिध्द झालेल्या अधिनियमान्वये अनधिकृत संस्था स्थापन करण्यास अथवा अनधिकृत पाठ्यक्रम सुरू करण्यास मनाई करण्यात आली आहे.

शैक्षणिक वर्ष २०१५-१६ मध्ये मान्यता दिलेल्या उपरोक्त तक्त्यातील किती संस्थांनी व्यवसाय अभ्यासक्रम सुरु केले, अभ्यासक्रम निहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण यांनी शासनास दिनांक ३०/१०/२०१५ पर्यंत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०८०७१६३५५५३३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajaram Gobaraji Jadhav

Digitally signed by Rajaram Gobaraji Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajaram Gobaraji Jadhav
Date: 2015.08.10 16:27:52 +05'30'

( रा. गो.जाधव )

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१

२) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई-१

३) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक (शालेय शिक्षण विभाग), पुणे.
(व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

४) सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय.
(व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

५) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी
(व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

६) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

७) मा. मंत्री (उ व तं.शि) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.

८) मा. राज्यमंत्री ( उ व तं.शि ) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.

९) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

१०) मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक.

११) सह सचिव (व्यशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक.

१२) निवड नस्ती (व्यशि-४)